“दिव्यांग कल्याण विभाग दिव्यांगांच्या दारी” हे अभियान प्रत्येक जिल्ह्यात राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : दिव्यांग-२०२३/प्र. क्र.५६/दि.क. २**
३१/३२/३५ “ए” विंग, मित्तल टॉवर,तिसरा मजला,
बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई- ४०००२१.
दिनांक : २८ जुलै, २०२३.

वाचा:-

१) दिव्यांग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५.
२) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६,
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:अपंग २०१३/प्र.क्र.२०१/अ.क. २, दि.२० फेब्रुवारी, २०१९,
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: शासाउ-१०.१०/प्र. क्र. ९६/१०/सा.उ.,दि.१३ मार्च, २०२३.
५) शासन निर्णय, दिव्यांग कल्याण विभाग, क्रमांक दिव्यांग-२०२३/प्र.क्र.५६/दि.क.२, दि.२३ मे,२०२३.

**शासन परिपत्रक:-**

विविध प्रवर्गातील दिव्यांग बांधवांच्या अडचणी सोडविण्यासाठी जिल्हा स्तरावर शासनाचे सर्व विभागाचे अधिकारी, सर्व शासकीय यंत्रणा एकाच ठिकाणी उपस्थित राहून दिव्यांगांच्या तक्रारी जाणून घेऊन त्याच ठिकाणी कामाचा निपटारा करता येईल. याकरीता या विभागाचा शासन निर्णय दिनांक २३ मे २०२३ नुसार **"दिव्यांग कल्याण विभाग दिव्यांगाच्या दारी"** हे अभियान राबविण्यात येत आहे. सोबत जोडलेल्या **“प्रपत्र ब”** प्रमाणे तारखेनिहाय राज्यातील सर्व जिल्हयांत अभियानाचे आयोजन करण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानाची जिल्हा स्तरावर प्रभावीपणे अंमलबजावणी होणेसाठी सर्वसाधारणपणे प्रमाणित कार्यपद्धती SOP (Standard operating procedure) असल्यास जास्तीत जास्त उपयुक्तता राहणार आहे. **यासाठी** "दिव्यांग कल्याण विभाग दिव्यांगाच्या दारी" हे अभियान जिल्हा स्तरावर राबविताना **खालीलप्रमाणे** सर्वसाधारण **कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा.**

अ) **अभियानाची पूर्वतयारी:-** यामध्ये खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

शासन निर्णय दि. २३ मे,२०२३ नुसार प्रत्येक जिल्ह्यात घ्यावयाच्या अभियानाच्या कार्यक्रमाचा दिनांक व अन्य तपशील संबंधित जिल्हाधिकारी यांनी राज्यस्तरीय समितीकडुन निश्चित करुन घेण्यात याव्यात अशा सुचना दिलेल्या आहेत. तथापि अभियानाचे मुख्य मार्गदर्शक मा.श्री ओमप्रकाश देशमुख ऊर्फ बच्चू कडू, मंत्रीपद दर्जा यांनी जिल्हानिहाय दिनांक “**प्रपत्र ब”** प्रमाणे निश्चित केले आहेत. यानुसार अभियानासाठी उपरोक्त शासन निर्णयान्वये गठित जिल्हा स्तरीय समितीची बैठक घेऊन सदर मोहिमेची पूर्व तयारी करावी. सदर बैठकीमध्ये दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियमाखालील दिव्यांगांच्या बाबीबाबत विचार होऊन साधारणत: खालील बाबींबाबत निर्णय घेण्यात यावा.

१. कार्यक्रमासाठी जागा निश्चित करणे.
२. अभियानाच्या कार्यक्रमाची जागा निश्चित झाल्यानंतर कार्यक्रमामध्ये जास्तीत जास्त दिव्यांग बांधवांचा सहभाग वाढविणेसाठी अभियानाबाबत स्थानिक वृत्तपत्र, एफ.एम.रेडियोद्वारे बातमी देण्यात यावी.
३. सद्यस्थितीत पावसाचे दिवस असल्याने कार्यक्रमासाठी मोठया हॉलची व्यवस्था करावी.
४. कार्यक्रमाची इमारत व परिसर दिव्यांगांसाठी सुगम्य असावा.
५. जिल्हाधिकारी यांनी जिल्ह्यातील सर्व विभाग प्रमुखांची बैठक घेऊन त्यांना त्यांच्या कर्तव्य व जबाबदा-यांबाबत मार्गदर्शन करावे.
६. प्रत्येक विभागासाठी स्टॉल निश्चित करुन देण्यात यावेत. (प्रपत्र “अ” प्रमाणे)
७. विविध स्टॉलची यादी (मार्गदर्शक स्टॉलची यादी सोबत जोडली आहे त्यानुसार स्थानिक परिस्थितीचा विचार करून यादी अंतिम करण्यात यावी.)
८. विविध विभागातील दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम कलम २२ खालील तक्रार निवारण अधिकाऱ्याची यादी संकलित करावी व सद्यस्थितीत दिव्यांगांच्या प्रलंबित अर्जाबाबतचा आढावा घ्यावा.
९. जास्तीत जास्त दिव्यांगांना अभियानाचा लाभ घेता यावा या अनुषंगाने त्यांची (पूर्व तयारी) Online नोंदणी करून घ्यावी व माहिती तसेच मागण्या संकलित करून घ्याव्यात.
१०.जिल्ह्यातील जास्तीत जास्त दिव्यांग लाभार्थ्यांपर्यंत पोहचण्यासाठी आशा सेविका व अंगणवाडी सेविका यांचेकडून त्यांच्या कार्यक्षेत्रातील दिव्यांग लाभार्थ्यांकडून त्यांना आवश्यक असलेल्या योजनेचे अर्ज भरुन घ्यावेत.
११.आशा सेविका व अंगणवाडी सेविका यांचेकडून प्राप्त झालेले दिव्यांग लाभार्थ्यांच्या अर्जांची विगतवारी करुन ज्या विभागाशी अर्ज संबंधित आहे, त्या विभागाकडे पाठविण्यात यावेत.
१२.आशा सेविका व अंगणवाडी सेविका यांचेकडून संबंधित विभागास प्राप्त झालेले दिव्यांगांचे अर्ज तसेच यापूर्वी संबंधित विभागात दिव्यांग लाभार्थ्यांचे प्रलंबित असलेले अर्ज यावर कार्यवाही करुन दिव्यांग लाभार्थ्यांस मंजूर झालेले लाभ/ द्यावयाचे प्रमाणपत्र अभियानाच्या कार्यक्रमादिवशी लाभार्थ्यांना देण्याकरीता नियोजन करावे.
१३.स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये (ग्रामीण व शहरी) दिव्यांगांसाठी आरक्षित ५ टक्के निधी बाबत आढावा घ्यावा, तसेच सदर निधी या अभियानासाठी कसा वापर करता येईल या बाबतचे नियोजन करावे.
१४.जिल्हा स्तरावरील विविध आस्थापनांतर्गत शासकीय भरती मध्ये दिव्यांग आरक्षणाची अंमलबजावणी चा आढावा घेऊन अनुशेष भरण्याबाबत कार्यवाही करावी.
१५.विविध शासकीय शाळा, महाविद्यालये व अन्य शैक्षणिक संस्थांमध्ये दिव्यांगांसाठी ५ टक्के आरक्षण निश्चित करण्यात आले आहे. याबाबत चा आढावा घेऊन अंमलबजावणी करावी.
१६.सर्व स्टॉलवर स्थानिक भाषा व मुकबधीर दिव्यांगांकरीता त्यांचे म्हणणे समजून घेण्यासाठी व त्यांना माहिती देण्यासाठी Sign language interpreter ची नेमणूक करण्यात यावी.
१७.जिल्हातील २०११ ची दिव्यांग लोकसंख्या व दि.३० मार्च, २०२३ चे वैश्विक ओळखपत्र (UDID CARD) प्रलंबित प्रकरणे, नवीन यावयाची प्रकरणे या माहितीचे अवलोकन करून जास्तीत जास्त दिव्यांगांना तपासणी करून वैश्विक ओळखपत्र व दिव्यांग प्रमाणपत्रे देण्याच्या दृष्टीने कार्यवाही करावी.

**ब) विभाग प्रमुखांच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या :-**

१. प्रत्येक विभाग प्रमुखांनी त्यांच्या विभागाच्या योजनांचा लाभ दिव्यांग लाभार्थ्यांना अभियानाच्या कार्यक्रमाच्या दिवशी कसा देता येईल याची रुपरेषा निश्चित करुन जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली होणाऱ्या बैठकीमध्ये मांडावी व अंतिम करुन घ्यावी.

२. प्रत्येक विभागाने आपल्या योजनांसाठी आवश्यक असलेल्या कागदपत्रांची माहिती दिव्यांग लाभार्थ्यांना मिळणेसाठी स्थानिक वृत्तपत्रांमध्ये बातमी द्यावी व आवश्यक जनजागृती करावी. जेणेकरुन अभियानाच्या कार्यक्रमा दिवशी दिव्यांग लाभार्थी योजनेसाठी आवश्यक असलेल्या कागदपत्रांसहीत उपस्थित राहतील व त्यांना योजनेचा लाभ घेणेसाठी अर्ज सादर करता येईल. **शक्य झाल्यास जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद) यांनी आकाशवाणीवर त्यांच्या मुलाखतींतून या बाबींवर प्रक्षेपण घडवून आणावे.**

३. प्रत्येक विभागाने आपल्या योजनांची माहिती पुस्तिका/घडीपत्रिका/ पॉम्पलेट जास्तीचे छापून घ्यावेत व कार्यक्रमादिवशी दिव्यांग लाभार्थ्यांना वाटप करण्यात यावेत.

४. दिव्यांगाच्या विविध योजना तसेच शासन निर्णयांचे ई-बुक चे क्युआर कोड तयार करुन कार्यक्रम स्थळी याबाबत माहिती व प्रसिध्दी करावी.

**क) कार्यक्रमाचे स्वरुप :-**

१. अभियानाच्या कार्यक्रमादिवशी जिल्ह्याच्या ठिकाणी दिव्यांग लाभार्थी पोहचल्यानंतर बस स्थानकापासून कार्यक्रमाच्या ठिकाणी पोहचण्यासाठी वाहनांची सुविधा उपलब्ध करुन द्यावी.

२. दिव्यांग लाभार्थी कार्यक्रमाच्या ठिकाणी पोहचल्यानंतर प्रत्येक दिव्यांग लाभार्थ्याची नोंदणी करुन घेण्यात यावी.यासाठी दिव्यांगत्वाच्या प्रवर्गनिहाय नोंदणी करुन घेणेसाठी सुविधा व मनुष्यबळ उपलब्ध करुन द्यावे. एकाच ठिकाणी गर्दी होऊ नये म्हणून नोंदणी काऊंटर्स पुरेशा संख्येने उपलब्ध करुन द्यावीत. नोंदणीसाठी ऑनलाईन पद्धतीने संगणकीय नोंदणीस प्राधान्य द्यावे.

३. वेगवेगळया विभागांच्या विविध योजनांचा लाभ घेणेसाठी दिव्यांग लाभार्थ्यांना वेगवेगळे अर्ज करणेसाठी प्रत्येक विभागाने त्यांचे विहीत नमुन्यातील अर्ज कार्यक्रमादिवशी लाभार्थ्यांना उपलब्ध करुन द्यावेत.

४. शासनांच्या योजनांचे अर्ज मॅन्युअली तसेच काही योजनांचे अर्ज हे ऑनलाईन पद्धतीने भरावे लागतात. याकरिता कार्यक्रमाच्या दिवशी प्रत्येक विभागाच्या स्टॉलवर दिव्यांग व्यक्ती लाभ घेऊ इच्छिणाऱ्या योजनेचा मॅन्युअली/ ऑनलाईन अर्ज भरण्यास तो दिव्यांग व्यक्ती सक्षम नसल्यास अर्ज भरण्यास मदत करण्याकरिता स्वयंसेवक तसेच ऑनलाईन अर्ज भरण्याकरिता संगणक व संगणक ऑपरेटर उपलब्ध करुन देण्यात यावेत. संगणक व संगणक ऑपरेटर स्वयंसेवक पुरेशा प्रमाणामध्ये उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी ही त्या त्या विभागांनी घ्यावी.

५. आशा सेविका व अंगणवाडी सेविका यांचेकडुन प्राप्त झालेले दिव्यांग लाभार्थ्यांचे अर्ज तसेच विभागाकडे यापूर्वी प्रलंबित असलेले दिव्यांगांचे अर्ज यावर कार्यक्रमाच्या पूर्वी कार्यवाही करुन पात्र लाभार्थ्यांना विभागाकडून देण्यात येणारे लाभ/ प्रमाणपत्र कार्यक्रमादिवशी संबंधित लाभार्थ्यांना वितरीत करण्यात यावेत.

६. विभागाकडे कार्यक्रमादिवशी प्राप्त झालेल्या योजनांच्या अर्जावर संबंधित विभागाने प्राधान्याने व तात्काळ कार्यवाही करावी. व कार्यक्रमाच्या दिवशी लाभार्थ्यास, त्यांनी भरलेल्या योजनेच्या अर्जासंबंधी

सदर योजनेचा लाभ त्यांना किती कालावधी मध्ये मिळेल याबाबत निश्चित हमी कार्यक्रमादिवशी देण्यात यावी .

७. कार्यक्रमासाठी उपस्थित असलेल्या दिव्यांग लाभार्थ्यांना प्रत्येक विभागाने आपल्या योजनांची माहिती द्यावी. यासाठी विभागांनी छपाई केलेले पॉम्पलेट/घडीपत्रिका यांचे वाटप करण्यात यावे.
   (१) अथवा QR Code ची उपलब्धता करून देऊन सर्वांना सदर पॉम्पलेट/घडीपत्रिका माहितीचे शासन निर्णय उपलब्ध करून द्यावेत.
   (२) जिल्हाधिकारी यांनी जिल्हा आरोग्य विभाग, जिल्हा वैद्यकीय महाविद्यालयाने त्यांचे डॉक्टर्स उपलब्ध करुन घेऊन शक्य झाल्यास तपासणी शिबिर घेऊन वैश्विक ओळखपत्राबाबतची तपासणी व नोंदणी करून घ्यावी.

८. जिल्हयातील डि.डी आर.सी.ने त्यांचेकडे प्राप्त झालेल्या अर्जानुसार कृत्रिम अवयव व साहित्याचे वाटप कार्यक्रमादिवशी करण्यात यावे.

९. कृत्रिम अवयव व साहित्य वाटप करणा-या स्वयंसेवी संस्था सी. आर. सी. अथवा डि.डी.आर.सी. यांचेकडे कार्यक्रमादिवशी प्राप्त झालेल्या अर्जानुसार दिव्यांग लाभार्थ्यांना आवश्यक कृत्रिम अवयव व साहित्य देणेसाठी दिव्यांग लाभार्थ्यांचे मोजमाप घ्यावे व त्याबाबतचे लाभार्थ्यी निहाय अभिलेखे तयार करावेत.

१०. कार्यक्रमादिवशी दिव्यांग लाभार्थ्यांसाठी पिण्याच्या पाण्याची चहापान व जेवणाची सोय करण्यात यावी.

११. कार्यक्रमाच्या ठिकाणी सुलभ संचार करण्यासाठी दिव्यांगांना आवश्यकतेनुसार व्हिलचेअर उपलब्ध करुन द्याव्यात.

१२. दिव्यांग लाभार्थ्यांना प्रत्येक विभागाच्या स्टॉलवर जाण्यासाठी अडचण येऊ नये यासाठी दिव्यांग सहाय्यक म्हणून कर्मचारी नेमण्यात यावेत. ज्यांचे मदतीने दिव्यांग लाभार्थी त्यांना आवश्यक आहे त्या विभागाच्या स्टॉलवर पोहचू शकतील.

**१३.** कार्यक्रमाचे ठिकाणी झेरॉक्स मशिन/स्कॅनर्स/प्रिंटर्स उपलब्ध ठेवावेत. जेणेकरुन दिव्यांग व्यक्तींना पेमेंट बेसिसवर या सुविधा देता येतील.

**ड) <u>अभियानानंतरची कार्यवाही</u>-**

१. अभियानाच्या कार्यक्रमादिवशी देण्यात आलेल्या लाभाबाबत तसेच प्राप्त झालेल्या अर्जाबाबत विभागाने वेगळ्याने अभिलेखे जतन करावेत.

२. प्रत्येक विभागाकडे कार्यक्रमादिवशी प्राप्त झालेल्या अर्जांवर विभागाने प्राधान्याने व तात्काळ कार्यवाही करुन पात्र लाभार्थ्यांना आवश्यक लाभ देण्यात यावा व प्रत्येक अर्जावर केलेल्या कार्यवाहीबाबत संबंधित लाभार्थ्यास कळविण्यात यावे.

३. या अनुषंगाने सर्व विभाग प्रमुखांनी त्यांच्या विभागाचा आढावा घेऊन प्राधान्याने कार्यवाही करावी.

४. कार्यक्रमामध्ये प्राप्त झालेल्या अर्जाच्या कार्यवाहीबाबत जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीमध्ये याचा आढावा घेण्यात यावा.

इ) अभियानाच्या जिल्हानिहाय तारखा अभियानाचे मुख्य मार्गदर्शक मा.श्री.ओमप्रकाश ऊर्फ बच्चू कडू यांच्या अनुकूलतेनुसार सोबतच्या “प्रपत्र ब” मध्ये दर्शविल्या आहेत. तरी सर्व जिल्हयांनी उपरोक्तनुसार कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७२८१८४००४०९३५ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SAIPRASAD DATTAGOUD MUKDADWAR
Date: 2023.07.28 18:49:44 +05'30'

**( सा.द.मुकदाडवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२..
५) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) मा. श्री.ओमप्रकाश उर्फ बच्चू कडू, विधानसभा सदस्य,
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई ४०० ०३२,
९) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१०) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर,
११) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) जिल्हाधिकारी (सर्व)
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद. (सर्व)
१५) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१६) जिल्हा पोलिस प्रमुख (सर्व)
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, नगरपालिका. (सर्व)
१८) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय.
१९) जिल्हा शल्य चिकित्सक. (सर्व)
२०) जिल्हा आरोग्य अधिकारी. (सर्व)
२१) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. (सर्व)
२२) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२५) जिल्हा कोषागार अधिकारी. (सर्व)
२६) निवडनस्ती.

# प्रपत्र अ

## प्रस्तावित स्टॉल्सची यादी

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| १. | दिव्यांग कल्याण आयुक्तालय | दिव्यांगांच्या विविध योजनांबाबतची माहिती पुस्तिका वितरित करणे व इतर माहिती. |
| २. | जिल्हाधिकारी कार्यालय, | मतदार नोंदणी |
| ३. | | संजय गांधी निराधार योजना |
| ४. | | आधार कार्ड |
| ५. | | जाती प्रमाणपत्र, शिधावाटप पत्रिका, पॅन कार्ड, उत्पन्न प्रमाणपत्र व इतर दाखले |
| ६. | दिव्यांग वित्त व विकास महामंडळ | १) **दिव्यांग स्वावलंबन कर्ज योजना :**<br>अ) राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग - ५ टक्के<br>आ) राज्य महामंडळाचा सहभाग - ०५ ते १० टक्के<br>इ) कर्ज मर्यादा - रु. ५०,०००/- ते ५ लक्ष<br>ई) व्याजदर - ५ ते ९ टक्के<br>उ) परतफेडीचा कालावधी - ५ वर्षे<br>२) **वैयक्तिक थेट कर्ज योजना :**<br>अ) कर्ज मर्यादा - रु. ५०,०००/-<br>आ) व्याजदर - २ टक्के<br>इ) परतफेडीचा कालावधी - ३ वर्षे<br>३) **महाशरद वेब पोर्टल** : राज्यातील दिव्यांग व्यक्तींना विनामुल्य सहाय्यक साधने / उपकरणे उपलब्ध करून देणे.<br>४) हरित उर्जेवर चालणाऱ्या पर्यावरणस्नेही फिरत्या वाहनांवरील दुकाने मोफत उपलब्ध करून देणे. |
| ७. | साहित्यरत्न लोकशाहिर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ | १) अनुदान योजना : वार्षिक उत्पन्न रु. १ लक्ष पर्यंत असणाऱ्या मातंग समाजातील अर्जदारास रु.५०,०००/- प्रकल्प मर्यादा असलेल्या व्यावसायिकासाठी रु.१०,०००/- अनुदान,<br>२) प्रशिक्षण योजना : व्यावसायिक प्रशिक्षण,<br>३) बीज भांडवल : वैयक्तिक प्रकल्पास अर्थसहाय्य<br>४) शैक्षणिक कर्ज योजना : देशात व परदेशात उच्च शिक्षणासाठी कर्ज |

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| ८. | संत रोहिदास चर्मोद्योग आणि चर्मकार विकास महामंडळ | १) ५० टक्के अनुदान योजना : चर्मकार समाजातील कुटुंबातील व्यक्तींना राष्ट्रीयकृत बँकेमार्फत रु. ५०,०००/- पर्यंत प्रकल्पांसाठी कमाल रु. १०,०००/- पर्यंत अर्थसहाय्य,<br>२) बीज भांडवल योजना : रु. ५ लक्षपर्यंत प्रकल्पांसाठी रु. ५ लक्ष रुपयांपर्यंत कर्जपुरवठा,<br>३) प्रशिक्षण योजना : तांत्रिक कौशल्य प्राप्त करण्यासाठी मोफत प्रशिक्षण,<br>४) गटई कामगारांना पत्र्याचे स्टॉल देणे, |
| ९. | महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ | १) अनुदान योजना : व्यवसायासाठी आर्थिक सहाय्य,<br>२) बीज भांडवल योजना : ५ लाखांपर्यंत गुंतवणूक असलेल्या प्रकल्पांसाठी २० टक्के बीज भांडवल रक्कम उपलब्ध करून देणे.<br>३) रु. १ लक्ष थेट कर्ज योजना : रु. १ लक्ष प्रकल्प मर्यादेतील प्रकल्पांसाठी रु. ८५,०००/- पर्यंत अनुदान.<br>४) प्रशिक्षण योजना : स्वयंरोजगारासाठी प्रशिक्षण |
| १०. | महाराष्ट्र राज्य इतर मागास वर्गीय वित्त आणि विकास महामंडळ | १)**मुदती कर्ज योजना** :<br>अ) इतर मागासवर्गातील पात्र लाभार्थींना स्वयंरोजगारासाठी कर्ज देण्यात येते.<br>आ) प्रकल्प मर्यादा रु.३.०० लक्ष पर्यंत.<br>इ) राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग ८५%.<br>ई) राज्य महामंडळाचा सहभाग १०%,<br>उ) लाभार्थीचा सहभाग ५%,३.व्याज दर ६%.<br>ऊ) परतफेडीचा कालावधी ५ वर्षे.<br>२) **४५ टक्के मार्जिन मनी योजना :** राष्ट्रीय आणि मागासवर्ग वित्त व विकास महामंडळाची योजना आहे. मत्ता निर्माण होणाऱ्या व मुख्यत: वाहन विषयक व्यवसायाकरीता लाभार्थीस स्वयंरोजगारासाठी कर्ज देण्यात येते.<br>• प्रकल्प मर्यादा रु. 5.00 लक्ष पर्यंत.<br>• बँकांच्या माध्यमातून रु.3.00 लक्षपेक्षा जास्त मालमत्ता निर्माण होणारे प्रकल्प.<br>• राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग 40%. |

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| | | • राज्य महामंडळाचा सहभाग 5%, लाभार्थीचा सहभाग 5%, बँकेचा सहभाग 50%. 4. व्याज दर 6% व बँकेच्या रक्कमेवर बँकेच्या दराने 5. परतफेडीचा कालावधी 5 वर्षे.<br>३) स्वर्णिमा योजना : राष्ट्रीय आणि मागासवर्ग वित्त व विकास महामंडळाची योजना आहे. महिला लाभार्थींना स्वयंरोजगारासाठी कर्ज देण्यात येते.<br>• प्रकल्प मर्यादा रु.0.75 लक्ष पर्यंत.<br>• राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग 95%. राज्य महामंडळाचा सहभाग 5%, लाभार्थीचा सहभाग निरंक,<br>• व्याज दर 5%.4.परतफेडीचा कालावधी 7 वर्षे.<br><br>५) **महिला समृद्धी योजना** : राष्ट्रीय आणि मागासवर्ग वित्त व विकास महामंडळाची योजना आहे. बचत गटातील महिलांना कर्ज देण्यात येते.<br>• ग्रामिण व शहरी भागातील महिलांना बचत गटांमार्फत कर्ज पुरवठा.<br>• प्रकल्प मर्यादा रु.5.00 लक्षपर्यंत बचत गटातील 20 सभासदांना प्रत्येकी रु.25,000/-<br>• राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग 95%. राज्य महामंडळाचा सहभाग 5%, लाभार्थीचा सहभाग निरंक.<br>• व्याज दर 4%.5.परतफेडीचा कालावधी 3 वर्षे.<br>६) **सूक्ष्म पतपुरवठा योजना** : राष्ट्रीय आणि मागासवर्ग वित्त व विकास महामंडळाची योजना आहे. स्वयंसेवी संस्थांच्या माध्यमातून महिला व पुरुष लाभार्थींना कर्ज देण्यात येते. |

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| | | • स्वयंसेवी संस्थेमार्फत बचत गटातील महिलांना / पुरुषांना संस्थेमार्फत कर्ज पुरवठा.<br>• प्रकल्प मर्यादा रु.5.00 लक्षपर्यंत संस्थेकडील बचत गटातील 20 सभासदांना प्रत्येकी रु.25,000/-.<br>• राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग 90%. राज्य महामंडळाचा सहभाग 5%, लाभार्थीचा सहभाग 5%.<br>• व्याज दर 5%.5.परतफेडीचा कालावधी 3 वर्षे.<br><br>६) **शैक्षणिक कर्ज योजना** : राष्ट्रीय आणि मागासवर्ग वित्त व विकास महामंडळाची योजना आहे. मान्यताप्राप्त स्वयंसेवी संस्थांच्या माध्यमातून महिला व पुरुष लाभार्थींना कर्ज देण्यात येते.<br>• आरोग्य विज्ञान, अभियांत्रिकी व संगणक या व्यावसायिक अभ्यासक्रमांकरीता केंद्रीय परिषदांची मान्यता असलेल्या अभ्यासक्रमांना पात्र संस्थांमध्ये प्रवेश घेतलेल्या विदयार्थ्यांना कर्ज.<br>• प्रति वर्ष रु.1.25 लक्ष पर्यंत 4 वर्षाकरीता रु.5.00 लक्ष.<br>• राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग 90%. राज्य महामंडळाचा सहभाग 5%, लाभार्थीचा सहभाग 5%.<br>• व्याज दर 4%, विदयार्थ्यींनींना 3.5%.<br>• परतफेडीचा कालावधी शिक्षण पूर्ण झाल्यावर<br>• महिन्याच्या कालावधीनंतर 5 वर्ष.<br><br>७) **२० टक्के बीज भांडवल योजना** : बँकांच्या माध्यमातून स्वयंरोजगारासाठी कर्ज देण्यात येते.<br>• राष्ट्रीयकृत बँका, जिल्हा अग्रणी बँका व जिल्हा मध्यवर्ती बँकांच्या माध्यमातून योजना राबविण्यात येते. |

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| | | • महामंडळाचा सहभाग 20%.<br>• लाभार्थीचा सहभाग 5% व बँकेचा सहभाग 75% असतो.<br>• महत्तम प्रकल्प मर्यादा रु.5.00 लक्ष आहे.<br>• महामंडळाच्या कर्ज रक्कमेवर व्याजाचा दर 6% .<br>बँकेच्या कर्ज रक्कमेवर बँकेच्या दराने व्याज आकारले जाते<br>• परतफेडीचा कालावधी पाच वर्ष आहे.<br>८) **रु. २५,०००/- पर्यंतची थेट कर्ज योजना** : राष्ट्रीय आणि मागासवर्ग वित्त व विकास महामंडळाची योजना आहे. पात्र लाभार्थींना स्वयंरोजगारासाठी कर्ज देण्यात येते.<br><table><tr><td>१</td><td>प्रकल्प मर्यादा रु. ३ लक्ष पर्यंत</td></tr><tr><td>२</td><td>राष्ट्रीय महामंडळाचा सहभाग ८५ टक्के राज्य महामंडळाचा सहभाग १० टक्के<br>लाभार्थीचा सहभाग ५ टक्के</td></tr><tr><td>३</td><td>व्याजदर ६ टक्के</td></tr><tr><td>४</td><td>परतफेडीचा कालावधी ५ वर्षे</td></tr></table> |
| ११. | वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ | १) विजाभज विद्यार्थ्यांना राज्य सरकारची मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती<br>२) इ.मा.व. विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती<br>३) विमाप्र विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व इतर शैक्षणिक सवलती<br>४) शिक्षण फी परीक्षा फी प्रदाने (विजाभज)<br>५) शिक्षण फी परीक्षा फी प्रदाने (इमाव )<br>६) इयत्ता १० वी च्या परिक्षेत विशेष प्राविण्य मिळवून इयत्ता ११ वी मध्ये प्रवेश घेतलेल्या तसेच इ.१२ वी मध्ये शिकणा-या विजाभज / विमाप्र वर्गाच्या मुला-मुलींना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्ता शिष्यवृत्ती |

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| | | ७) इ.८ वी ते १० वी मध्ये शिकणा-या विजाभज व विमाप्र मुलींना सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना<br>८) व्यावसायिक पाठयक्रमाशी संलग्न असलेल्या वसतिगृहांतील विद्यार्थ्यांना विद्यावेतन तसेच व्यावसायिक पाठयक्रमाशी संलग्न असणाऱ्या वसतिगृहाच्या व शासकीय वसतिगृहाच्या बाहेर राहणाऱ्या परंतु वसतिगृहात प्रवेश मिळण्यासाठी पात्र असणाऱ्या विद्यार्थ्यांना विद्यावेतन.<br>९) सैनिकी शाळेत प्रशिक्षण घेणा-या विजाभज / विमाप्र विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता :-<br>१०) औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये शिकणा-या विजाभज/विमाप्र विद्यार्थ्यांना विद्यावेतन:-<br>११) औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये शिकणा-या विजाभज/विमाप्र विद्यार्थ्यांना विद्यावेतन:-<br>१२) माध्यमिक शाळेत शिक्षण घेणाऱ्या विजाभज / विमाप्र विद्यार्थ्यांना शिक्षण फी, परीक्षा फी प्रदान करणे.<br>१३) माध्यमिक शाळेत शिकत असलेल्या विजाभज / विमाप्र विद्यार्थ्यांना गुणवत्ता शिष्यवृत्ती प्रदाने : (जि.प.योजना)<br>१४) माध्यमिक शाळेत शिकत असलेल्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देणे लेखाशिर्ष :<br>१५) इयत्ता ५ वी ते ७ वी मध्ये शिकणा-या विजाभज / विमाप्र विद्यार्थीनीना सावित्रीबाई फुले शिष्यवृत्ती योजना.<br>१६) विमुक्त जाती भटक्या जमाती आश्रमशाळा |

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| | | १७) विमुक्त जाती भटक्या जमाती विद्यार्थ्यांसाठी निवासी कनिष्ठ महाविद्यालये<br>१८) विद्यानिकेतन शाळा चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान योजना.<br>१९) उसतोड कामगारांच्या मुलांच्या शिक्षणासाठी स्वयंसेवी संस्थाना सहाय्यक अनुदाने<br>**२०)** वाहन चालक प्रशिक्षण योजना (विजाभज, इमाव व विमाप्र) |
| १२. | अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ | १) वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना :<br>२) गट कर्ज व्याज परतावा योजना :<br>३) गट प्रकल्प कर्ज योजना : |
| १३. | डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) | • शिक्षण आणि प्रशिक्षण<br>• आर्थिक उन्नतीसाठी<br>• रोजगार<br>• विशेष सहाय्य<br>• अपंग कल्याण<br>• सामाजिक एकात्मता<br>• सामाजिक उपाय<br>• पुरस्कार |
| १४. | महात्मा ज्योतिबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती) | • शिक्षण आणि प्रशिक्षण<br>• आर्थिक उन्नतीसाठी<br>• रोजगार<br>• विशेष सहाय्य<br>• अपंग कल्याण<br>• सामाजिक एकात्मता<br>• सामाजिक उपाय<br>• पुरस्कार |
| १५. | छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) | • शिक्षण आणि प्रशिक्षण<br>• आर्थिक उन्नतीसाठी<br>• रोजगार<br>• विशेष सहाय्य<br>• अपंग कल्याण |

| स्टॉल.क्र. | संबंधित विभाग / कार्यालय | विषय |
|---|---|---|
| | | • सामाजिक एकात्मता<br>• सामाजिक उपाय<br>• पुरस्कार |
| १६. | महिला आर्थिक विकास महामंडळ | |
| १७. | Artificial Limb Manufacturing Corporation of India (ALMCO) | |
| १८. | Aliyawar Jang National Institute of Speech and Hearing | |
| १९. | National Institute for the Empowerment of Persons with Intellectual Disabilities (NIEPID) | |
| २०. | सार्वजनिक आरोग्य विभाग<br>वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग | Unique Disabilities ID (UDID)Cards |
| २१. | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | |
| २२. | महानगर पालिका | |
| २३. | जिल्हा परिषद | |
| २४. | | |
| २५. | | |
| २६. | शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ | |
| २७. | महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळ | |
| २८. | महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण | |
| २९. | विद्युत पुरवठा व परिवहन | |
| ३०. | भारतीय रेल्वे, | |
| ३१. | जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्र | |
| ३२. | संमिश्र प्रादेशिक केंद्र (सीआरसी) | |
| ३३. | महावीर स्वयंसेवी संस्था | |
| ३४. | प्रथम स्वयंसेवी संस्था | |
| ३५. | निर्मला स्वयंसेवी संस्था | |
| ३६. | टाटा सन्स | |
| ३७. | जय वकील फाँऊडेशन | |
| ३८. | नॅशनल असोसिएशन फॉर ब्लाइंड | |
| ३९. | रत्नदिप | |

Digitally signed by SAIPRASAD DATTAGOUD MUKDADWAR
Date: 2023.07.28 18:51:52 +05'30'

## प्रपत्र ब

| अ.क्र. | जिल्हा | दिनांक | वार |
|---|---|---|---|
| १ | अमरावती | ७ ऑगस्ट, २०२३ | सोमवार |
| २ | नागपूर | ८ ऑगस्ट, २०२३ | मंगळवार |
| ३ | भंडारा | ९ ऑगस्ट, २०२३ | बुधवार |
| ४ | गोंदिया | १० ऑगस्ट, २०२३ | गुरुवार |
| ५ | गडचिरोली | ११ ऑगस्ट, २०२३ | शुक्रवार |
| ६ | पुणे | २२ ऑगस्ट, २०२३ | मंगळवार |
| ७ | सातारा | २३ ऑगस्ट, २०२३ | बुधवार |
| ८ | सांगली | २४ ऑगस्ट, २०२३ | गुरुवार |
| ९ | कोल्हापूर | २५ ऑगस्ट, २०२३ | शुक्रवार |
| १० | रायगड | २९ ऑगस्ट, २०२३ | मंगळवार |
| ११ | ठाणे | ३० ऑगस्ट, २०२३ | बुधवार |
| १२ | पालघर | ३१ ऑगस्ट, २०२३ | गुरुवार |
| १३ | नाशिक | ५ सप्टेंबर, २०२३ | मंगळवार |
| १४ | धुळे | ६ सप्टेंबर, २०२३ | बुधवार |
| १५ | नंदुरबार | ७ सप्टेंबर, २०२३ | गुरुवार |
| १६ | जळगाव | ८ सप्टेंबर, २०२३ | शुक्रवार |
| १७ | अहमदनगर | १२ सप्टेंबर, २०२३ | मंगळवार |
| १८ | छ. संभाजी नगर | १३ सप्टेंबर, २०२३ | बुधवार |
| १९ | जालना | १४ सप्टेंबर, २०२३ | गुरुवार |

| | | | |
|---|---|---|---|
| २० | बीड | १५ सप्टेंबर, २०२३ | शुक्रवार |
| २१ | सोलापूर | २० सप्टेंबर, २०२३ | बुधवार |
| २२ | उस्मानाबाद | २१ सप्टेंबर, २०२३ | गुरुवार |
| २३ | लातूर | २२ सप्टेंबर, २०२३ | शुक्रवार |
| २४ | चंद्रपुर | २६ सप्टेंबर, २०२३ | मंगळवार |
| २५ | वर्धा | २७ सप्टेंबर, २०२३ | बुधवार |
| २६ | यवतमाळ | २९सप्टेंबर, २०२३ | शुक्रवार |
| २७ | अकोला | ३ ऑक्टोंबर, २०२३ | मंगळवार |
| २८ | वाशिम | ४ ऑक्टोंबर, २०२३ | बुधवार |
| २९ | हिंगोली | ५ ऑक्टोंबर, २०२३ | गुरुवार |
| ३० | बुलढाणा | ६ ऑक्टोंबर, २०२३ | शुक्रवार |
| ३१ | परभणी | १० ऑक्टोंबर, २०२३ | मंगळवार |
| ३२ | नांदेड | ११ ऑक्टोंबर, २०२३ | बुधवार |
| ३३ | सिंधुदुर्ग | १७ ऑक्टोंबर, २०२३ | मंगळवार |
| ३४ | रत्नागिरी | १८ ऑक्टोंबर, २०२३ | बुधवार |

Digitally signed by SAIPRASAD DATTAGOUD MUKDADWAR
Date: 2023.07.28 18:53:04 +05'30'